**पोलीस आयुक्तबृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवर**
**एक दंगल नियंत्रण पथक निर्माण करणेबाबत**

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र.पिओएस-३१०१/प्र.क्र.१४/पोल-३
दिनांक : २१ सप्टेंबर, २००२

वाचा :-(१) पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई यांचे पत्र क्र.पो.आ./कक्ष २(र व का) निरसी/२/२००२, दि.२.१.२००२, दि.१६.४.२००२
(२) पोलीस महासंचालक महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्र.पोमसं-२६/५५२८/ दंगल काबू पथके/बृहन्मुंबई/२००२, दि.२२.३.२००२
(३) सह पोलीस आयुक्त (प्रशा) यांचे अ.शा.पत्र क्र.४२/सहपोआ(प्रशा)पी.ए २००२, दिनांक १९.७.२००२

प्रस्तावना :- मुंबई शहरातील वाढती लोकसंख्या, वाढते नागरीकरण, दहशतवाद इत्यादी अनेक कारणांमुळे दिवसेंदिवस कायदा व सुव्यवस्था हाताळण्याचा प्रश्न जटील व गुंतागुंतीचा बनलेला आहे आणि तो राबविण्यात सध्याच्या पोलीस यंत्रणेवरील वाढलेला दैनंदीन कामाचा कमालीचा ताण लक्षात घेता तसेच मुंबई शहरातून उद्‌भवणा-या दंगलीमुळे निर्माण होणा-या परिस्थितीवर परिणामकारकरित्या नियंत्रण ठेवण्याच्या दृष्टीने सध्याच्या सशस्त्र पोलीस दलातून मनुष्यबळ उपलब्ध करुन देणे अत्यंत कठीण व जिकीरीचे होत आहे. या सर्व बाबी विचारात घेऊन त्या अनुषंगाने निर्माण होणा-या कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न तातडीने हाताळण्यासाठी राज्यात दोन दंगल नियंत्रण पथके निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

(१) वरीलप्रमाणे वस्तुस्थिती विचारात घेता मुंबई शहरातील दंगलीमुळे उद्‌भवणारी तातडीची परिस्थिती हाताळण्यासाठी शासनाने पहिल्या टप्प्यात पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवर एक दंगल नियंत्रण पथक निर्माण करण्यचा निर्णय घेतला आहे.

(२) प्रस्तूत एक दंगल नियंत्रण पथकासाठी बृहन्मुंबई यांचे आस्थापनेवर विमानतळ सुरक्षेसाठी निर्माण केलेल्या पदांमधून कार्यमुक्त होणा-या पदांमधून खालील नमूद केलेली विविध संवर्गातील एकूण १३० पदे पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवर वर्ग करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | वेतनश्रेणी (रुपयात) |
|---|---|---|---|
| १ | सहाय्यक पोलीस आयुक्त | १ | ८०००-२७५-१३५०० |
| २ | पोलीस निरीक्षक | १ | ७४५०-२२५-११०५० |
| ३ | पोलीस उप निरीक्षक | ४ | ५५००-१७५-९००० |
| ४ | पोलीस हवालदार | १२ | ४०००-१००-६००० |

| | | | |
|---|---|---|---|
| ५ | पोलीस नाईक | १८ | ४०००-१००-६००० |
| ६ | पोलीस शिपाई | ८३ | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० |
| ७ | पोलीस शिपाई (चालक) | ४ | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० |
| | एकूण | १३० | |

३. उपरोक्त नमूद केलेल्या पदांची मुदत प्रथमतः कार्यभार स्वीकारल्यापासून दि.२८.२.२००३ पर्यंत राहील.या पदांना नियमानुसार विहित वेतन व भत्ते देय असतील.

४. उपरोक्त १३० पदांच्या निर्मितीसाठी वार्षिक आवर्ती खर्च रु.१,३९,००,९८०/- एवढा अपेक्षित असून तो सन २००२ - २००३ च्या वित्तिय वर्षातील मंजूर अनुदानातून भागवण्यात येणार आहे.यास्तव पोलीस आयुक्त बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवर निर्माण केलेल्या एक दंगल नियंत्रण पथकासाठी सन २००२-२००३ वर्षाकरिता सन २००२ च्या पावसाळी अधिवेशनात पूरक मागणी बाब क्र.१३ अन्वये विधीमंडळाने संमत केली आहे. सदर पदांवरील खर्च २०५५ पोलीस १०८ राज्य मुख्यालय पोलीस (०२) शहर पोलीस (०२) (०१)" या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. प्रस्तुत प्रकरणी आवश्यक साधनसामुग्री ,वाहने, शस्त्रास्त्रे, प्रशिक्षण इ. करिता आवश्यक अनावर्ती खर्च पोलीस दलाच्या आधूनिकिकरणांतर्गत योजनेतून भागवण्याबाबत आवश्यक प्रस्ताव सादर करण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सिआर ६७१/२००२ /व्यय-७ दि.१ जून २००२ व अनौसं. ५८९/विसु दि.२.७.२००२ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सं. शं. इंगळे )
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. पोलीस महासंचालक व महानिरीक्षक महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२. पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई.
३ प्रधान महालेखाकार,महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा ) मुंबई.
४. महालेखापाल-महाराष्ट्र -१ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ),मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
७. वित्त विभाग,व्यय-७
८ गृह विभाग,बियूडी-१ ,पोल-१अ, पोल-४,पोल-५(अ)/(ब), पोल-७.
९. निवड नस्ती (पोल-३.)